GR-200404081332260001-0100

**विशेष अधिकारी, विशेष कार्यकारी अधिकारी, सेवा भरती कार्यालय, मुंबई येथील पदे पुढे चालू ठेवण्या बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : प्रानिमं/३०००/प्र.क्र.१०/२०००/१३-अ
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक:- ३१ जानेवारी ,२००१.

संदर्भ : १) शासन निर्णय, सा.प्र.वि,क्र.प्रानिमं ३०९९/प्र.क्र.६९/९९/१३-अ, दि.११ जून,१९९९
२) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.प्रानिमं/३०००/प्र.क्र.१०/२०००/१३-अ, दि. ३१ मे,२०००
३) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.प्रानिमं/३०००/प्र.क्र.१०/२०००/१३-अ, दि. २१ जून,२०००
४) शासन ज्ञापन, सा.प्र.वि.क्र.प्रानिमं/३०००/प्र.क्र.१०/२०००/१३-अ, दि. २१ जुलै,२०००
५) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.प्रानिमं/३०००/प्र.क्र.१०/२०००/१३-अ, दि. २२ सप्टेंबर,२०००

**शासन निर्णय**

राज्यातील भूतपूर्व निवड मंडळाची कार्यालये दि.२१.६.२००० पासून बंद करण्यात आल्यानंतर , त्यांच्याकडील निवड प्रक्रियेचे प्रलंबित कामकाज संबंधित निवड समित्यांकडे हस्तांतरीत करण्याचे काम करण्यासाठी व प्रलंबित निवड प्रक्रियेच्या कामी समन्वयाची भूमिका पार पाडण्याकरिता विशेष अधिकारी, विशेष कार्यकारी अधिकारी, सेवा भरती कार्यालयास दि.३१.१२.२००० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तथापि, सदर काम अद्यापि अपूर्णावस्थेत असल्याने विशेष अधिकारी, विशेष कार्यकारी अधिकारी, सेवा भरती कार्यालय, मुंबई येथील पदांना दिनांक २८ फेब्रुवारी,२००१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजुरी देत आहे :-

१) विशेष अधिकारी/परीक्षा नियंत्रक (१),
२) कक्ष अधिकारी (१),
३) सहायक (२),
४) लेखा लिपिक व उपलेखापाल (२),
५) लघुलेखक (१),
६) लिपिक (२),
७) शिपाई व सफाईगार (५)

विशेष अधिकारी यांनी सर्व संबंधित कार्यालयांशी समन्वय साधून निवड प्रक्रिये संबंधिचे प्रलंबित कामकाज मुदतीपूर्वीच पूर्ण करणे त्यांचेवर बंधनकारक आहे. तसेच भूतपूर्व निवड मंडळाच्या निवड प्रक्रियेची प्रलंबित कामकाजाची माहिती संबंधित निवड समित्यांकडून संकलित करुन त्यांनी दि.१५.२.२००१ पर्यंत शासनास सादर करणे आवश्यक आहे.

अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करावयाच्या पदांच्या संदर्भात विशेष अधिकारी यांनी शासन ज्ञापन सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २१ जुलै २००० च्या आदेशानुसार कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(चं.शा.बनसोडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई,
२. मुख्यमंत्र्यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई./उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई,
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
४. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परीक्षा ), मुंबई/नागपूर,
६. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
* ८. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा,मुंबई,
* ९. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा,मुंबई,
* १०. प्रबंधक,लोक आयुक्त/उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* ११. सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मुंबई,
* १२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* १३. सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. सर्व मंत्रालयीन विभाग
१८. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०. विशेष अधिकारी,विशेष कार्यकारी अधिकारी ,सेवा भरती मुंबई
२१. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
२२. निवड नस्ती.

* पत्राने